विमा संचालनालयाच्या आस्थापनेवरील कनिष्ठ तांत्रिक अधिकारी (गट-ब) राजपत्रित या पदासाठी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२५.०४.२०१६ अन्वये विहित केलेली वयोमर्यादा लागु करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्थाप-२०१५/प्र.क्र.२७/विमा प्रशासन**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०२ मे, २०१७

**वाचा :-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही २०१५/प्र.क्र.४०४/कार्या.१२/ दि.२५ एप्रिल, २०१६.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासन सेवेत प्रवेशासाठी खुल्या प्रवर्गातील उमेदवाराकरीता कमाल वयोमर्यादा ३८ वर्षे व मागासवर्गीय उमदेवाराकरीता कमाल वयोमर्यादा ४३ वर्षे लागु करण्यात आली आहे. सदर वयोमर्यादा विमा संचालनालयाच्या आस्थापनेवरील कनिष्ठ तांत्रिक अधिकारी गट-ब राजपत्रित या पदाला लागु करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

विमा संचालनालयाच्या आस्थापनेवरील कनिष्ठ तांत्रिक अधिकारी गट-ब राजपत्रित या पदाकरीता सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही २०१५/प्र.क्र.४०४/कार्या.१२/ दि.२५.०४.२०१६ नुसार शासन सेवेतील प्रवेशासाठी, खुल्या प्रवर्गातील उमेदवाराकरीता कमाल वयोमर्यादा ३८ वर्षे व मागासवर्गीय उमेदावाराकरीता कमाल वयोमर्यादा ४३ वर्षे लागु करण्यात येत आहे.

२ तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२५.०४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेली वाढीव वयोमर्यादा लागु करण्यासाठी विमा संचालनालयाच्या आस्थापनेवरील सर्वच पदांच्या सेवाप्रवेश नियमामध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही तात्काळ सुरू करण्यात येईल.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.३९४/१७/ दि.०६.०४.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५०३१२४०१९८६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubhangi Rajan Sheth

Digitally signed by Shubhangi Rajan Sheth
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed6787d4f25b2cc00214a10047a10d4fa848c8d19fb8dda27b4525e3ace2c767, cn=Shubhangi Rajan Sheth
Date: 2017.05.03 12:42:37 +05'30'

**( शुभांगी शेठ )**
सह सचिव, वित्त विभाग

**प्रत,**

१) मा. मंत्री, वित्त यांचे सचिव

२) मा. राज्यमंत्री, वित्त यांचे सचिव
३) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई
५) महालेखापाल, स्थानिक संस्था, लेखापरीक्षा व लेखे, मुंबई
६) अ.मु.स. (वित्त) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
७) प्र.स. ( व्यय ) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
८) प्र.स. (ले. व को.) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग
१०) सामान्य प्रशासन विभाग कार्या-१२ मंत्रालय, मुंबई
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१२) अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४) संचालक, विमा संचालनालय, मुंबई.
१५) निवडनस्ती, वित्त विभाग/विमाप्रशासन.